आपले सरकार सेवा केंद्र

महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायती स्तरावरील "आपले सरकार सेवा केंद्र" यामार्फत महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ अंतर्गत राज्य शासनाच्या विविध प्रशासकीय विभागांनी अधिसूचित केलेल्या सर्व ऑनलाईन लोकसेवांकरीता ऑन लाईन अर्ज स्विकारणे आणि सेवा पुरविणे याबाबत दिशानिर्देश.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक- आरटीएस -०४२५/प्र.क्र. ६७/न. वि.-३२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०५ मे, २०२५.

वाचा : १) महाराष्ट्र लोक सेवा हक्क अधिनियम, २०१५.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१८९/नवि-२०, दि.२३.०६.२०१५.
३) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३९८/नवि-२०, दि.२२.०८.२०१६.
४) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१८९/नवि-२०, दि. ०४.०९.२०१७.
५) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. मातंस/जेव्ही-टीसीएस/प्र.क्र.२०/३९ दि.१६.०९.२००८.
६) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१८०/नवि-२०, दि. १४.०८.२०१९.
७) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.३२/नवि-३२. दि. ३०.०९.२०२२.
८) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.३२/नवि-३२, दि. १५.१२.२०२२.
९) नगरपरिषद प्रशासन संचालनालयाचे पत्र क्र. नपप्रसं/का-०८/ई-गव्हर्नस / RST / २०२३ /३८८५ दि.२०.०९.२०२२
१०) नगरपरिषद प्रशासन संचालनालयाचे पत्र क. नपप्रसं/का-०८/ई-गव्हर्नस / RST / २०२३ /३८८५ दि.१२.०७.२०२३
११) नगर विकास विभाग, शासन निर्णय क. संकीर्ण-०९२२/प्र.क्र.३२/नवि-३२. दि.०९.०१.२०२४.
१२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क. संकीर्ण-०९२४/प्र.क्र.३२/नवि-३२. दि.२७.११.२०२४.

**प्रस्तावना :**

"महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम-२०१५ हा अधिनियम राज्यात दि.२८.४.२०१५ पासून लागू करण्यात आला आहे. या अधिनियमांतर्गत, नगर विकास विभागाने संदर्भीय शासन निर्णय क्र. २ ते १२

अन्वये एकूण सत्तर (७०) लोकसेवा अधिसूचीत केल्या आहेत. त्या लोकसेवा देण्यासाठी नगर विकास विभागाने पदनिर्देशित अधिकारी, प्रथम अपिलिय प्राधिकारी व द्वितीय अपिलिय प्राधिकारी घोषित केले आहेत. तसेच सदरहू लोकसेवा पुरविण्याकरीता उक्त नमूद शासन निर्णयांन्वये कालमर्यादा देखील विहित केली आहे. सध्या प्रत्येक महानगरपालिका/नगरपरिषदेत "आपले सरकार सेवा केंद्र कार्यरत आहेत. सदरहू केंद्र हे शहरातील जनतेला Online सेवा पुरविणारे सर्व समावेशक केंद्र असण्याची आवश्यकता विचारात घेवून, शासनाच्या सर्व विभागांनी उक्त अधिनियमाखाली अधिसूचित केलेल्या सर्व ऑनलाईन लोकसेवांसाठी अर्ज स्वीकृत करण्याचे व सेवा पुरविण्याचे केंद्रस्थान होणे अपेक्षित आहे. मा. मुख्य आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग यांच्या अध्यक्षतेखाली दि.१९.११.२०२४ रोजी झालेल्या बैठकीत त्यांनी ही बाब सूचित केली होती. तसेच दि.०८.०१.२०२५ रोजी मा. मुख्यमंत्री महोदय यांचे अध्यक्षतेखाली सह्याद्री अतिथीगृह, मलबार हिल, मुंबई येथे राज्य सेवा हक्क आयोगाच्या मुद्यांसंदर्भात झालेल्या बैठकीमध्ये मा. मुख्यमंत्री महोदय यांनी सुद्धा महानगरपालिका/नगरपरिषद स्तरावरील "आपले सरकार सेवा केंद्र" यामार्फत राज्याच्या विविध प्रशासकीय विभागांनी अधिसूचित केलेल्या सर्व सेवा करिता ऑनलाईन अर्ज स्वीकृत करण्याबाबत संमती दिली आहे. तसेच महानगरपालिका/ नगरपरिषदांच्या नागरी सेवा केंद्रामार्फत आपले सरकार पोर्टलवर उपलब्ध ऑनलाईन सेवा उपलब्ध करण्याबाबत मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री (नगर विकास) यांनी महाराष्ट्र लोकसेवा हक्क आयोगाच्या कार्यक्रमामध्ये घोषित केले आहे. त्यानुसार संबंधित क्षेत्रिय अधिकारी व प्राधिकारी यांना उचित दिशानिर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

उपरोक्त पार्श्वभूमीवर, "महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम-२०१५" अंतर्गत महानगरपालिका/ नगरपरिषद स्तरावरील "आपले सरकार सेवा केंद्र" यांच्या मार्फत राज्य शासनाच्या नगर विकास विभागाच्या सेवांसह इतर विविध प्रशासकीय विभागांनी अधिसूचित केलेल्या सर्व ऑनलाईन लोकसेवा नागरिकांना उपलब्ध करून देण्यास आणि या लोकसेवांकरिता ऑनलाईन अर्ज स्विकृत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे. तसेच या सेवा सदर केंद्रांमार्फत उपलब्ध करून देण्याकरीता

आयुक्त तथा प्रशासक, सर्व महानगरपालिका आणि मुख्याधिकारी, सर्व नगरपारिषदा/नगरपंचायती यांना पुढीलप्रमाणे दिशा निर्देश देण्यात येत आहेत :-

१) आयुक्त तथा प्रशासक, सर्व महानगरपालिका आणि मुख्याधिकारी, सर्व नगरपारिषदा/ नगरपंचायती यांनी त्यांच्या अखत्यारितील "आपले सरकार सेवा केंद्रांची" यादी जिल्हाधिकाऱ्यांना सादर करुन जिल्ह्याच्या NIC केंद्राकडून महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायतीच्या नावाने आपले सरकार सेवा केंद्रांचे USER ID प्राप्त करुन घ्यावे. त्याचप्रमाणे "आपले सरकार पोर्टल" वरुन देण्यात येणाऱ्या सर्व ऑनलाईन सेवांकरीता "महा-आयटी" महामंडळाकडून महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायती नावाने तेथील "आपले सरकार सेवा केंद्र" करीता USER ID प्राप्त करुन घेण्यासाठी जिल्हाधिकाऱ्यांमार्फत उक्त महामंडळाकडे प्रस्ताव पाठवून सेवाकेंद्र निहाय USER ID प्राप्त करुन घ्यावे.

२) योग्य ती सुरक्षितता "महा-आयटी" महामंडळाने ऑनलाईन अर्जाचे शुल्क स्विकारण्याकरिता, संबंधित महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायतीच्या "आपले सरकार सेवा केंद्र" यांना तात्काळ Wallet सुविधा उपलब्ध करुन द्यावी.

३) शासनाच्या सर्व विभागांनी आपले सरकार पोर्टलवरुन ऑनलाईन देण्यात येणाऱ्या सर्व अधिसूचित केलेल्या सेवांसाठी ऑनलाईन अर्ज स्वीकृत करण्याची व अनुज्ञेय दाखल्यांची संगणकीय प्रत देण्याची कार्यवाही सर्व महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायतीमधील आपले सरकार सेवा केंद्रात तसेच सर्व महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायतीमध्ये अस्तित्वात असलेल्या आपले सरकार कक्षामार्फत करण्यात यावी.

४) सर्व संबंधित अधिकारी व सक्षम प्राधिकारी यांनी या आदेशांनुसार सत्वर कार्यवाही करून, त्याचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

५) सर्व जिल्हाधिकारी आणि आयुक्त तथा प्रशासक, सर्व महानगरपालिका आणि मुख्याधिकारी, सर्व नगरपारिषदा/नगरपंचायती यांनी उपरोक्त सूचनांप्रमाणे आवश्यक ती कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट www.maharashtra.gov.in वर उपलब्ध करण्यात आला असून, असून त्याचा संकेतांक २०२५०५०५१२३४०४३२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by SACHIN DATTATRAY SAHASRABUDDHE
Date: 2025.05.05 12:34:47 +05'30'

**( सचिन सहस्त्रबुध्दे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव, राजभवन मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री (नगर विकास) यांचे, प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
५. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे, खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
७. मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. मुख्य आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, म.रा., मुंबई
९. प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाआयटी महामंडळ, मुंबई.
११. विभागीय आयुक्त (सर्व).
१२. जिल्हाधिकारी (सर्व).
१३. आयुक्त तथा प्रशासक, सर्व महानगरपालिका
१४.मुख्याधिकारी, सर्व नगरपारिषदा/नगरपंचायती
१५. नगर विकास विभाग, सर्व कार्यासने.
१६. निवडनस्ती (कार्या-नवि-३२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई